# बुद्धिस्तोत्र

संपादन:

## पं. महादेवशास्त्री जोशी



मूल्य: दोन रुपये

# सरस्वती–विद्यादेवता

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**

भगवद्गीता, अ. ४–३८

विद्येसारखी पवित्र वस्तू दुसरी नाही. पडतील ते कष्ट सहन करून ती मिळवायची असते. विद्या प्राप्त झाली की आपल्याला सर्व क्षेत्रांची द्वारे खुली होतात. माणसाला माणूसपण येते, ते विद्येमुळेच. म्हणूनच विद्याहीन माणसाला पशू म्हटले आहे. विद्या हे एक धन असे आहे, की ते कधीच खर्च होत नाही, ते तुम्ही जसजसे उपयोगात आणाल, तसतसे वाढतच जाते. दुसऱ्याला दिले, तरी वाढते. ब्रह्माचर्याश्रम म्हणजे वयाची पहिली चोवीस वर्षे. ती केवळ विद्येसाठीच राखून ठेवलेली आहेत. ‘ बाळपणी विद्यावृक्षासी लावावे, तरुणपणी घ्यावे फळ त्याचे ’ असे मुळी वचनच आहे.

या विद्येची देवता सरस्वती. तिचे रूपध्यान मोठे आकर्षक आहे. ते सौम्य आहे, शीतल आहे. कुंदपुष्प किंवा हिमतुषार यांच्यासारखा तिचा वर्ण गोरापान आहे. ती शुभ्र वस्त्र नेसते, शुभ्र हंसावर बसते. क्वचित चित्रविचित्र असा मोरही तिसा बसायला आवडतो. तिच्या मांडीवर वीणा व हातात पुस्तक आहे. तिच्या चार भुजा ही चार दिशांची प्रतीके होत. त्याचा अर्थ असा की, विद्येने माणसाची दृष्टी चौफेर होते. पुस्तक हे ज्ञानप्राप्तीचे साधन. तिच्या हातात एक माळही आहे. माळ ही मनाच्या एकाग्रतेचे

प्रतीक; वीणा ही माणसाच्या जीवनात रसिकता आणते, संगीत आणते. तिच्या एका हाती कमलही आहे. कमल हे सृष्टीचे प्रतीक. आपल्या अंतरात ज्ञानाने हे कमल उमलावयाचे आणि आणि प्रतिभेच्या साहृयाने नवनवे शोध लावायचे. ज्ञानाची प्रतिसृष्टी निर्माण करायची. अशी ही प्रसन्न आणि वरदायिनी सरस्वती.

विद्या प्राप्त व्हावी, मिळवलेल्या विद्येचे स्मरण राहावे, बुद्धीत प्रतिभेचे स्फुरण व्हावे, म्हणून प्रत्येक विद्यार्थ्यांने सरस्वतीची उपासना करायला हवी. पुढे जे स्तोत्र दिले आहे, ते उपासनेचे एक साधन म्हणूनच दिले आहे. तुम्ही सकाळी स्नान केल्यावर देवापुढे बसा, किंवा सरस्वतीच्या चित्रापुढे बसा. डोळे मिटून काही क्षण सरस्वतीचे ध्यान करा आणि मग सावकाशपणे पुढे दिलेले स्तोत्र शुद्ध उच्चाराने म्हणा. ही उपासना तुम्हाला फलद्रूप होईल, असे याज्ञवल्क्य मुनींनी सांगितले आहे.

## पूर्वपीठिका

पुढे दिलेल्या सरस्वतीस्तोत्राची पूर्वपीठिका अशी–

वैशंपायन या गुरूच्या शापामुळे याज्ञवल्क्य मुनीची सर्व विद्या नष्ट झाली. याज्ञवल्क्य मुनी परम दुःखित होऊन पुण्यप्रद अशा सूर्यमंडलात गेला. तेथे त्याने सूर्यस्तवन केले व वारंवार सूर्याला प्रार्थिले.

ती स्तुती एकून सूर्याने त्याला वेद व वेदांगे पढवली आणि त्या अध्ययनाची स्मृती रहावी म्हणून वाग्देवतेचे स्तवन करायला सांगितले. नंतर याज्ञवल्क्य स्नान करून शुचिर्भूत झाले व त्यांनी सरस्वतीचे जे स्तोत्र केले ते असे–

# सरस्वती स्तोत्र

**याज्ञवल्क्य उवाच–**

कृपां कुरु जगन्मातर्मामेवं हततेजसम् ।
गुरुशपात्स्मृतिभ्रष्टं विद्याहीनं च दुःखितम् ॥१॥

ज्ञानं देहि स्मृतिं विद्यां शक्ति शिष्यप्रबोधिनीम् ।
ग्रंथकर्तृत्वशक्ति च सुशिष्यं सुप्रतिष्ठितम् ॥२॥

प्रतिभां सत्सभायां च विचार क्षमतां शुभाम् ।
लुप्तं सर्वं दैवयोगान्नवीभूतं पुनःकुरु ॥३॥

यथांकुरं भस्मनि च करोति देवता पुनः ।
ब्रह्मस्वरूपा परमा ज्योतीरूपा सनातनी ॥४॥

सर्वविद्याधिदेवी या तस्यै वाण्यै नमोनमः ।
विसर्गबिंदुमात्रासु यदधिष्ठानमेव च ॥५॥

तदाधिष्ठात्री या देवी तस्यै नित्यै नमोनमः ।
व्याख्यास्वरूपा सा देवी व्याख्याधिष्ठातृरूपिणी ॥६॥

यया विना प्रसंख्यावान् संख्यां कर्तु न शक्यते ।
कालसंख्यारूपा या तस्यै देव्यै नमोनमः ॥७॥

भ्रमासिध्दान्तरूपा या तस्यै देव्यै नमोनमः ।
स्मृतिशक्ति ज्ञानशक्ति बुध्दिशक्ति स्वरूपिणी ॥८॥

प्रतिभा कल्पनाशक्तिर्या च तस्यै नमोनमः ।
सनत्कुमारो ब्रह्माणं ज्ञानं पप्रच्छ यत्र वै ॥९॥

बभूव मूकवन्सोपि सिध्दान्तं कर्तुमक्षमः ।
तदा जगाम भगवानात्मा श्रीकृष्ण ईश्वरः ॥१०॥

उवाच स च तां स्तौहि वाणीमिष्टां प्रजापते ।
स च तुष्टाव तां ब्रह्मा चाज्ञया परमात्मनः ॥११॥

चकार तत्प्रसादेन तदा सिध्दान्तमुत्तमम् ।
यदाप्यनंतं पप्रच्छ ज्ञानमेकं वसुंधरा ॥१२॥

बभूव मूकवत्सोऽपि सिध्दान्तं कर्तुमक्षमः ।
तदा तां स च तुष्टाव संत्रस्तः कश्यपाज्ञया ॥१३॥

ततश्चकार सिध्दान्तं निर्मलं भ्रमभंजनम् ।
व्यासः पुराणसूत्रं च पप्रच्छ वाल्मीकिं यदा ॥१४॥

मौनीभूतश्च सस्मार तामेव जगदंबिकाम् ।
तदा चकार सिध्दान्तं तद्वरेण मुनीश्वरः ॥१५॥

संप्राप्य निर्मलं ज्ञानं भ्रमांधध्वंसदीपकम् ।
पुराणसूत्रं श्रुत्वा च व्यासः कृष्णकलोद्भवः ॥१६॥

तां शिवां वेद दध्यौ च शतवर्षं च पुष्करे ।
तदा त्वत्तो वरं प्राप्य सत्कवींद्रो बभूव ह ॥१७॥

तदा वेदविभागं च पुराणं च चकार सः ।
यदा महेंद्रः पप्रच्छ तत्त्वज्ञानं सदाशिवम् ॥१८॥

क्षणं तामेव संचिंत्य तस्मै ज्ञानं ददौ विभुः ।
पप्रच्छ शद्बशास्त्रं च महेंद्रश्च बृहस्पतिम् ॥१९॥

दिव्यं वर्षसहस्त्रं च सा त्वां दध्यौ च पुष्करे ।
तदा त्वत्तो वरं प्राप्य दिव्यंवर्षसहस्त्रकम् ॥२०॥

उवाच शद्बशास्त्रं च तदर्थं च सुरेश्वरम् ।
अध्यापिताश्च ये शिष्या यैरधीतं मुनीश्वरैः ॥२१॥

ते च तां परिसंचिंत्य प्रवर्तते सुरेश्वरीम् ।
त्वं संस्तुता पूजिता च मुनींद्रैर्मुनिमानवैः ॥२२॥

दैत्येंद्रैश्चसुरैश्चापि ब्रम्हविष्णुशिवादिभिः ।
जडीभूतः सहस्त्रास्यः पंचवक्त्रश्चतुर्मुखः ॥२३॥

यां स्तोतुं किमहं स्तौमि तामेकास्येन मानवः ।
इत्युक्त्वा याज्ञवल्क्यश्च भक्तिनम्रात्मकंधरः ॥२४॥

प्रणनाम निराहारो रुरोद च मुहुर्मुहुः ।
ज्योतीरुपा महामाया तेन दृष्टाप्युवाच तम् ॥२५॥

सुकवींद्रो भवेत्युक्त्वा वैकुंठं च जगाम हें ।
याज्ञवल्क्यकृतं वाणीस्तोत्रमेतत्तु यः पठेत् ॥२६॥

सुकवींद्रो महावाग्मी बृहस्पतिसमो भवेत् ।
महामूर्खश्च दुर्बुध्दिर्वर्षमेकं यदा पठेत् ।
स पंडितश्च मेधावी सुकवींद्रो भवेद्ध्रुवम् ॥२७॥

**सरलार्थ–** याज्ञवल्क्य म्हणाले–हे माते, गुरुशापामुळे मी स्मृतिहीन, विद्याहीन, दुःखित व निस्तेज झालो आहे. मजवर तू कृपा कर. मला ज्ञान, विद्या, स्मृती ज्ञानदानाची शक्ती, ग्रंथकर्तृत्वशक्ती, प्रतिष्ठित असा चांगला शिष्य, सज्जनांच्या सभेत प्रतिभा व सुंदर विचारशक्ती या गोष्टी दे. कारण वर उल्लेखलेल्या सर्व गोष्टी दैवयोगाने माझ्या ठिकाणी लुप्त झाल्या आहेत तू त्यांचे पुनरुज्जीवन कर.

ईश्वर एखादे वेळी राखेतही अंकुर उत्पन्न करतो. त्या प्रमाणेच तू माझे सर्व पुन्हा मला दे. ब्रह्मस्वरूप, परम-ज्योतिस्वरूप, सनातन आणि सर्व विद्यांची मुख्य देवता जी सरस्वती, तिला माझा नमस्कार असो. हे सरस्वती विसर्ग, अनुस्वार, मात्रा, यांचे आश्रयस्थान असे जे अक्षर, त्याचीही अधिष्ठात्री देवता तूच आहेस. तुला माझे आदरपूर्वक वंदन. व्याख्यारूप आणि व्याख्येची अधिष्ठात्री देवताही तूच आहेस.

हे देवी, अनंत संख्यावाचक कालाची गणना तुझ्यावाचून करता येत नाही, म्हणून कालसंख्यारूप अशा तुला पुनः पुनः माझे नमस्कार असोत. भ्रम व सिद्धांत ही दोन्ही रूपे तुझीच आहेत. स्मृतिशक्ती, ज्ञानशक्ती, बुद्धिशक्ती ही तिन्ही रूपे तुझीच आहेत. प्रतिभा व कल्पना हीही तुझीच रूपे होत. तुला वारंवार नमस्कार.

एकदा सनत्कुमाराने ब्रह्मदेवाला ज्ञान विचारले; पण ते सांगायला निघताच ब्रह्माही जणू मुका झाला. त्याला निश्चित सिद्धान्त सांगता येईना. म्हणून तो भगवंताकडे गेला. त्याचा सर्व वृत्तांत ऐकून भगवान त्याला म्हणाला, 'हे ब्रह्मदेवा, हे सर्व काही तू वाग्वदेवतेलाच विचार. तू त्या सरस्वतीचे स्तवन कर.'

तदनुसार ब्रह्मदेवाने सरस्वतीचे स्तवन आरंभले व तिच्या कृपेने त्याला निश्चित ज्ञान कळले. ज्या वेळी पृथ्वीने शेषनागाला ज्ञानाविषयी विचारले, तेव्हा तोही मुक्यासारखा स्तब्ध झाला. मग त्याने कश्यपाच्या आज्ञेने सरस्वतीचे स्तवन केले, तेव्हा तो ब्रह्मसिद्धान्त सांगण्यास समर्थ झाला. व्यासांनी जेव्हा वाल्मीकींना पुराणे व सूत्रे यांचे रहस्य विचारले, तेव्हा त्यांनाही मौन पडले. त्यांनी जेव्हा जगदंबेचे स्तवन केले, तेव्हाच त्यांना तिच्या वराने व्यासांची जिज्ञासा पूर्ण करता आली. मग व्यासांनी वाल्मीकींकडून पुराणे व सूत्रे श्रवण केली. नंतर पुष्कर क्षेत्रात शंभर वर्षे देवीचे ध्यान केले. तेव्हा देवीने व्यासांना वर दिला आणि त्यानंतर व्यास हे कविश्रेष्ठ ठरले.

व्यासांनी त्यानंतर वेदांचे विभाग केले आणि पुराणे निर्माण केली. महेंद्र शंकराकडे ज्ञान विचारायला गेला असता शंकरानेही सरस्वतीचे ध्यान करून तिच्या कृपा-प्रसादानेच महेंद्राला ज्ञान दिले. महेंद्र बृहस्पतीला शब्दशास्त्र विचारायला गेला असता बृहस्पतीने पुष्कर क्षेत्रात दिव्य सहस्त्र वर्षे तप करून देवीला प्रसन्न करून घेतले व नंतर तिच्या वरानेच त्याने देवेंद्राला व्याकरणशास्त्र पढवले.

देवेंद्राने ज्या शिष्यांना व्याकरण शिकवले, त्या शिष्यांनीही ते अध्ययन करण्याच्या प्रसंगी देवीचे चिंतन केले व तिच्या कृपेनेच ते आपापल्या कृत्याला प्रवृत्त झाले.

हे मुनिश्रेष्ठ, मनु, मानव, दैत्यश्रेष्ठ व ब्रह्मा-विष्णु-महेश्वरादि सर्व देव यांनीही तुझे स्तवन व पूजन केले आहे. या सरस्वतीचे स्तवन करायला प्रवृत्त झालेला सहस्त्रमुख शेष, पंचमुख शंकर आणि चतुर्मुख ब्रह्मा हे सारे जडमू झाले, तिथे हे देवी, माझ्यासारख्या यःकश्चित् मनुष्याने तुझे कसे बरे स्तवन करावे ?' असे बोलून याज्ञवल्क्य मुनी-भक्तीने देवीपुढे विनम्र झाला. मग देवीच्या कृपेसाठी निराहार राहून व वारंवार तिला नमस्कार करून तो शोक करू लागला. त्यानंतर ती ज्योतिःस्वरूपिणी महामाया सरस्वती त्याच्यापुढे प्रकट होऊन त्याला म्हणाली.

'हे याज्ञवल्क्यमुने, तू माझ्या कृपाप्रसादाने उत्तमोत्तम कवी होशील' असे बोलून ती सरस्वती दुसऱ्याच क्षणी वैकुंठलोकी निघून गेली.

याज्ञवल्क्यानी केलेले हे स्तोत्र जो पठण करील, तो उत्तम कवी व बृहस्पतीसारखा वक्ता होईल. महामूर्ख व मंदबुद्धी पुरुषाने जर याचे एक वर्ष पाराधण केले, तर तोही निश्चयाने कवी, बुद्धिमान व पंडित होईल.



---


प्रकाशक : सौ. शालिनी व. खाडिलकर,
शालिनी प्रकाशन, द्वारा
श्रीगंधर्व-वेद प्रकाशन,
१२८६ सदाशिव पेठ, पुणे ३०.

मुखपृष्ठ : मोहन थत्ते

मूल्य : २ रुपये

मुद्रक : श्री. पां. र. अंबिके,
अनसूया मुद्रणालय,
१३९८ सदाशिव पेठ, पुणे ३०



# बुद्धिस्तोत्र

किं. रु. २

- मतिमंदाना बुध्दिवान करणारे
- बुध्दिवानाला तेजस्वी करणारे
- विस्मरणाला स्मरण देणारे
- विद्यार्थ्यांना नित्य पाठसाठी

याज्ञवल्क्य मुनींचे बुध्दिस्तोत्र...

संपादन: पं. महादेवशास्त्री जोशी

शालिनी प्रकाशन
द्वारा: श्री गंधर्व वेद प्रकाशन
१२८६ सदाशिव (चिमण्या गणपती जवळ) पुणे ३०

मोहन थत्ते

मुखपृष्ठ छपाई : स. म. खाडिलकर आणि कं. प्रिंटर्स पुणे, ३०